**जुन्नर वनविभागांतर्गत वनपरिक्षेत्र जुन्नर, माणिकडोह बिबट निवारा केंद्राचे विस्तारीकरण करणेच्या अनुषंगाने फेज-२ मधील युनिट क्रमांक ६ करीता दिवस / रात्र पिंजरे तयार करण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.डल्ब्युएलपी ०२.२५.२४/प्र.क्र. ४४/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ फेब्रवारी, २०२५

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२४/लेखा/प्र.क्र.३३ /७५८/२०२४-२५, दिनांक २८.०१.२०२५.

**प्रस्तावना:-**

मा. मुख्यमंत्री तथा अध्यक्ष, राज्य वन्यजीव मंडळ यांच्या अध्यक्षतेखाली राज्य वन्यजीव मंडळाच्या दिनांक ०४.१२.२०२० रोजी पार पडलेल्या १६ व्या बैठकीत महाराष्ट्र राज्यातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये ट्रांझीट ट्रीटमेंन्ट सेन्टर स्थापित करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे.

जुन्नर वनविभागांतर्गत वनपरिक्षेत्र जुन्नर, माणिकडोह बिबट निवारा केंद्राचे विस्तारीकरण करणेच्या अनुषंगाने फेज-२ मधील युनिट क्रमांक ६ करीता दिवस / रात्र पिंजरे तयार करण्याच्या अंदाजपत्रकास अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची विनंती केली आहे.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या जुन्नर वनविभागांतर्गत वनपरिक्षेत्र जुन्नर, माणिकडोह बिबट निवारा केंद्राचे विस्तारीकरण करणेच्या अनुषंगाने फेज-२ मधील युनिट क्रमांक ६ करीता दिवस / रात्र पिंजरे तयार करण्याच्या रु. ४०८.०७ लक्ष इतक्या रक्कमेच्या ढोबळ अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम (प्रा) विभाग, पुणे यांनी दिलेल्या तांत्रिक सहमतीच्या अनुषंगाने खालील अटींच्या अधिन राहून (वित्तीय मान्यता वगळून) शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी उपरोक्त नमूद अंदाजपत्रकातील कामे सुरु करण्यापूर्वी स्थापत्य व विद्युत विषयक कामांना वित्त विभागाचा शासन निर्णय दिनांक २०.९.२०१९ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक २५.९.२०१९ मधील परिपत्रकातील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांची तांत्रिक मान्यता असल्याची खातरजमा करावी.

२. अंदाजपत्रक व नकाशे उपभोक्ता विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून साक्षांकित करुन घेण्यात यावे.

३. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

४. सदरची कामे प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या रक्कमेतच पूर्ण होतील याची दक्षता घेण्यात यावी.

५. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधीत विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.

६. तांत्रिक मंजुरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७ प्र.क्र.११/ नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

८. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

९. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामाचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

१०.सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.

११.ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.

१२.सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८० मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशाची अवहेलना होणार नाही, याची सुध्दा दक्षता घ्यावी.

१३.वित्त विभागाच्या दिनांक १.४.२०२४ व दिनांक २५.७.२०२४ रोजीच्या परिपत्रकातील अटी व वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१४.शासन निर्णय क्रमांक एमएससी-२०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

१५.कामांची अंमलबजावणी करताना कामांचे एकत्रीकरण करुन नियमानुसार ई-निविदा प्रणाली अवलंबण्याची दक्षता घ्यावी.

१६.सदर मान्यता केंद्रीय प्राणिसंग्रहालय प्राधिकरण, नवी दिल्ली यांच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक :- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक २०.०९.२०१९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र. १३४ (१), १३४(२) आणि १३४ (३) मधील विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०२१७१७२०३३५९१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

UDAY
CHANDRAKANT
DHAGE

Digitally signed by UDAY CHANDRAKANT DHAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=d50c7e8b1126d276bbe49105f9d24fff67dc9032e4afab15f5d0d94a0ea6cf5a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=097E903F6E5707A0A9A3CDAEBE40C9235E8FDA1EE2C8C4EA7713D6497937DCED, cn=UDAY CHANDRAKANT DHAGE
Date: 2025.02.17 17:35:01 +05'30'

**(उदय ढगे)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.
५. उप वनसंरक्षक (प्रादेशिक), जुन्नर.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. कार्यासन फ-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

****